**मधुमेह आणि स्थुलत्वामुळे ओढवणा-या आजारांच्या वाढत्या प्रमाणावर नियंत्रणाकरिता उपाययोजना करण्यासाठी कृती गटाची (टास्क फोर्स) स्थापना करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक आरोग्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २०१६/ प्र.क्र. २९७/आरोग्य३अ**

गो.ते. रुग्णालय संकुल इमारत , १० वा मजला

मंत्रालय , मुंबई -०१

दिनांक: २८ ऑक्टोबर,२०१६

**प्रस्तावना:-**

भारतात संसर्गजन्य रोगामुळे होणा-या मृत्यूइतकेच असंसर्गजन्य रोगांमुळे होणा-या मृत्यूचे प्रमाण आहे. एकूण मृत्यूच्या कारणात ६० टक्के वाटा मधुमेह व इतर असंसर्गजन्य रोगांचा आहे. स्थूलत्वामुळे असंसर्गजन्य रोग जास्त प्रमाणात होतात. त्यामुळे मधुमेह,स्थूलत्व व इतर असंसर्गजन्य आजारांच्या प्रमाणावर नियंत्रण आणण्यासाठी उपाययोजना करण्यासाठी कृती गटाची (टास्क फोर्स) स्थापना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

मधुमेह, स्थूलत्व व इतर असंसर्गजन्य आजारांच्या प्रमाणावर नियंत्रण आणण्यासाठी खालीलप्रमाणे कृती गटाची स्थापना करण्यास व त्यांनी राबवावयाच्या विविध उपक्रमास व कार्यवाहीस या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

कृती गटातील सदस्यांची नावे :-

1. Commissioner of Health & MD-NHM
2. Dr. Subhash Salunke, Ex-Director General Health Services, Senior Advisor to Health Systems Support Unit, PHFI
3. Directorate of Health Services, Mumbai
4. Additional Director of Health Services (F.W.) Pune
5. Joint Director of Health Services (NCD) Mumbai
6. Dr. Shashank Joshi- Endocrinologist, Honorary professor Sir. JJ Hospital,Mumbai
7. Dr. Nalini Shah-Endocrinologist KEM Hospital,
8. Dr. Gemon-Sr. Prof at PHFI
9. Dr. Swati Bhave- Paediatrician, Executive Director AACCI-Pune
10. Dr. Jayashree S. Todkar- Gen. Laparoscopic and Bariatric surgeon- Pune

11. Dr.Ashish Contractor-Sr. Physiotherapist and expert in sport therapy.
12. Dr.Preeti Phatale- Childhood and adolescent specialist- Aurangabad,
13. Dr.Aniruddha Dharmadhikari- Cardiologist,
14. Dr.Grishma Shenoy- Consultant in physical therapy.
15. Dr.Prakash Doke- Professor of Community medicine at Bharati Vidyapeeth, Pune.
16. Dr.Vimal Pahuja-Metabolic Physician and Diabetologist.- Mumbai.
17. Dr.Phulrenu Chauhan, Hinduja Hospital, Mumbai.

मधुमेह,स्थूलत्व व इतर असंसर्गजन्य आजारांच्या प्रमाणावर नियंत्रण आणण्यासाठी करावयाच्या उपाययोजनेअंतर्गत वरील कृती गटाने करावयाची कार्यवाही खालीलप्रमाणे असेल :-

१. असंसर्गजन्य रोगांसाठी कारणीभूत घटकांचे विश्लेषण करुन त्याच्या नियंत्रणाकरिता उपाययोजना सुचविणे
२. असंसर्गजन्य रोग व स्थुलत्व संबंधी जनजागृती करण्यासाठी शास्त्रोक्त ( IEC ) साहित्य तयार करणे
३. असंसर्गजन्य रोग व स्थुलत्व नियंत्रणाकरिता आरोग्य विभागातील अधिकारी/कर्मचारी यांच्या प्रशिक्षण व कार्यशाळेसाठी मार्गदर्शक सूचना तयार करणे,
४. राष्ट्रीय कर्करोग, मधुमेह,हृदयरोग व पक्षाघात प्रतिबंधक व नियंत्रण कार्यक्रमाची प्रभावीपणे अंमलबजावणी करण्यासाठी प्राथमिक आरोग्य केंद्र ते राज्यस्तरावरील आरोग्य संस्थांच्या बळकटीकरणाकरीता मार्गदर्शक सूचना तयार करणे ,
५. आरोग्यपूर्ण जीवनशैली अवलंबिण्याकरिता स्थूलत्वास कारणीभूत ठरणा-या फास्ट फूडची निर्मिती करणा-या कंपन्यांवर नियंत्रण ठेवण्यासाठी धोरण तयार करणे,
६. RBSK, RNTCP, RKSK, NUHM, National family planning program इ.विविध राष्ट्रीय कार्यक्रम व असंसर्गजन्य रोग व स्थुलत्व नियंत्रण कार्यक्रम यांच्या समन्वयाकरिता मार्गदर्शक सूचना तयार करणे
७. असंसर्गजन्य रोग व स्थुलत्व नियंत्रणाकरीता इम्युनोलॉजीकल घटकांवर तज्ञांच्या विचाराप्रमाणे मार्गदर्शक सूचना तयार करणे,

८. असंसर्गजन्य रोग व स्थुलत्व नियंत्रणाकरीता आयुष विभागांच्या सेवा जास्तीतजास्त प्रमाणात उपयोग करुन घेण्याकरिता मार्गदर्शक सूचना तयार करणे,

९. असंसर्गजन्य रोगांचे वाढते प्रमाण पाहता, त्याच्या नियंत्रणासाठी आरोग्य संस्थांचे व राज्य असंसर्गजन्य रोग कक्षाचे बळकटीकरण करण्याकरिता इतर अनुषंगिक मार्गदर्शक सूचना तयार करणे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक क्रमांक २०१६१०२८१५५८३८७५१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vivek Rambhaji Dahiphale

Digitally signed by Vivek Rambhaji Dahiphale
DN: CN = Vivek Rambhaji Dahiphale, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Dept
Date: 2016.10.28 17:52:40 +05'30'

(विवेक दहिफळे)

सह सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. आयुक्त,(कु.क.) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान
२. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
३. अतिरिक्त संचालक, (असंसर्गजन्य रोग) आरोग्य सेवा संचालनालय,मुंबई
४. सर्व उप संचालक,आरोग्य सेवा